**औद्योगिक प्रशिक्षण संस्था मांडवी जिल्हा मुंबई शहर या संस्थेच्या प्रशासकीय इमारत व कार्यशाळा बांधकामासाठी तरतूद वितरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः औप्रसं-२०१३/प्र.क्र.७२/का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-३२

तारीख: १५ नोव्हेंबर, २०१४.

वाचा -

1) **शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक : आयटीआय-२००९/ (११/०९)/ व्यशि-३, दि. २९/८/२००९**
2) **शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक : आयटीआय-२०१०/ (१७०/१०)/ व्यशि-२ , दि.११/८/२०१०**
3) **शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक: औप्रसं-२०१०/प्र.क्र १५१ /का.८, दि. २२.०२.२०११.**
4) **शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक : औप्रसं-२०१३/प्र.क्र ७२/का.८, दि. ११.०३.२०१४.**

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्यांक समाजातील विद्यार्थ्यांसाठी ४२ अल्पसंख्याक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुस-या/तिस-या पाळीत २४८ तुकडया त्याचप्रमाणे बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरू होणा-या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये २८ तुकड्या सुरू करण्यास दि.२९.८.२००९ व दि.११.८.२०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

औद्योगिक प्रशिक्षण संस्था मांडवी जिल्हा मुंबई शहर या संस्थेच्या प्रशासकीय इमारत व कार्यशाळा बांधकामासाठी उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या दिनांक ११.०८.२०१० च्या शासन निर्णयान्वये रू.८,१४,३८,५५४/- (अक्षरी रुपये आठ कोटी चौदा लाख अडतीस हजार पाचशे चोपन्न मात्र) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णय दि.२२.०२.२०११ अन्वये रू.२.०० कोटी इतका निधी तसेच संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णय दि.११.०३.२०१४ अन्वये औद्योगिक प्रशिक्षण संस्था मांडवी जिल्हा मुंबई शहर या संस्थेच्या प्रशासकीय इमारत व कार्यशाळा बांधकामासाठी रु.०.८० कोटी असा एकूण रु. २.८० कोटी इतका निधी आतापर्यत

वितरीत करण्यात आला आहे. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वरळी यांनी उर्वरित अनुदान देण्याची विनंती केली आहे. या बांधकामासाठी टप्प्याटप्प्याने अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. औद्योगिक प्रशिक्षण संस्था मांडवी, जिल्हा मुंबई शहर या संस्थेच्या प्रशासकीय इमारत व कार्यशाळा बांधकामासाठी रू.२,००,००,०००/-(रू. दोन कोटी फक्त )इतकी तरतूद वितरीत करण्यास वरिष्ठ सचिव समितीने मान्यता देतांना नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

२. सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/कार्यालयीन आदेश/वित्तीय नियमावली/सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा.

३. या योजनेअतंर्गत अल्पसंख्याक समाजातील विदयार्थ्यांना प्रवेश देवून त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व केलेल्या खर्चाचा तपशिल व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी विहित मुदतीत शासनास सादर करावा.

४. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यक्रम, (०१) (०६) अल्पसंख्याक वस्तीतील औद्योगिक प्रशिक्षिण संस्थांना अनुदान देण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए १२२) ३१ -सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर )" या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २५९/१४७५ दि.१५.०९.२०१४ व वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.८८४/१४/व्यय.४ दि.०१.१०.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११०१५२७०७२११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2014.11.15 16:58:15 +05'30'

**(समीर साळुंखे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,

२. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

३. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था (सर्व), महाराष्ट्र राज्य, (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

४. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई

५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई

६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

८. संबधित जिल्हा कोषागार अधिकारी, संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचेमार्फत

९. नियोजन विभाग का. १४७५,

१०.वित्त विभाग, व्यय-४/ अर्थ-३ व १४,

११.अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, यांनी कृपया सदर निधी B.D.S. प्रणालीवर तात्काळ उपलब्ध करुन द्यावा.

१२.निवडनस्ती.